**प्रयोगात्मक कलेल्या माध्यमातून महाकाव्यावर आधारित सांस्कृतिक कार्यक्रमाचे गेटवे ऑफ इंडिया येथे आयोजित होणाऱ्या कार्यक्रमास व त्यावरील खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२४/ प्र.क्र.३१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२५

**वाचा :** १) या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि. १९.०१.२०२४
२) या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि. २५.०४.२०२५

**प्रस्तावना:-**

सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत दरवर्षी वेगवेगळ्या कार्यक्रमांचे आयोजन होत असते. यामध्ये कृषी संस्कृती, आदिम संस्कृती, लोकसंस्कृती, ग्रामीण संस्कृती, चित्रपट, नाटक याचबरोबर अध्यात्म व प्रबोधन याविषयीही कार्यक्रम केले जातात. तसेच महत्त्वाचे साहित्यिक व महत्त्वाचे साहित्य यावर आधारित विविध सादरीकरणेही केली जातात. विविध साहित्यिकांचे अध्यात्मिक साहित्य, महाकाव्य यावर आधारित काही कार्यक्रम यापूर्वीही संचालनालयाने आयोजित केलेले आहेत. अशाच प्रकारचे एक महाकाव्य म्हणजे रामायण महर्षि वाल्मिकी यांनी लिहिलेले हे रामायण आपल्या संस्कृतीचाच एक भाग आहे. या रामायणावर आधारित महाराष्ट्रात अनेक लोक कलाकार पाहावयास मिळतात. जसे की दशावतार, अनेक लोककलांमधून रामायणातील प्रसंग साकारले जातात. ग. दि. माडगुळकर रचित व बाबूजी यांच्या सुरातून बद्ध झालेले गीतरामायण आजही मराठी मनावर मोहिनी घालण्याचे काम करत आहे. सदर कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये केली आहे. मात्र, सदरचा कार्यक्रम दर्जेदार होण्यासाठी काही अतिरिक्त खर्च झाला असून त्यास उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता त्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रयोगात्मक कलेल्या माध्यमातून महाकाव्यावर आधारित गेटवे ऑफ इंडिया येथे आयोजित झालेल्या सांस्कृतिक कार्यक्रमास व त्यावरील आयोजनासाठीचा अतिरिक्त खर्च रुपये १०,७५,०००/- (अक्षरी दहा लक्ष पंचाहत्तर मात्र ) इतक्या अतिरिक्त खर्चास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (०२)(०२),जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (२२०५ १५०७)-५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३.	यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४.	सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५.	सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०२१७५७४३३१२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.06.02 17:58:58 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४